मिरकरवाडा, जिल्हा रत्नागिरी येथील बंदरातील नौकांचा जलमार्ग मोकळा करण्यासाठी गाळ काढण्याचा कामासाठीचा निधी वितरीत करणेबाबत..

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक :- मत्स्यवि-१००७/प्र.क्र.३३२/पदुम १४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक २९ मार्च, २०१०

वाचा :-१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र.मत्स्यवि-१००४/प्र.क्र.११५/पदुम-१४ दि.२९ जुलै, २००४
२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र.मत्स्यवि-१००६/प्र.क्र.२४६/पदुम-१४ दि.०५ ऑगस्ट, २००६
३) आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई यांचे क्रमांक मत्स्य/सा/०५१४०१/८९/२००४, भाग-९ दि.११-०५-२००९ चे पत्र
४) केंद्र शासनाचे पत्र क्र.No.३३०१३-६/२००४-FY(H), दि.२३-०४-२००९
५) केंद्र शासनाचे पत्र क्र.No.३३०१३-६/२००४-FY(H), दि.१४-१२-२००९

**प्रस्तावाना :-**

शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक मत्स्यवि-१००४/प्र.क्र.११५/पदुम-१४, दि.२९ जुलै, २००४ अन्वये कोकण विकास पॅकेजअंतर्गत गाळ काढणेच्या कामास प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आली आहे व यासाठी आवश्यक असलेला रु.९.८२ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. मिरकरवाडा बंदरातील गाळ काढण्याचे काम केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत करावयाचे असून त्याकरीता लागणारा खर्च केंद्र शासन ५०% व राज्य शासन ५०% असा करावयाचा आहे. सिंधुराज ड्रेजरने गाळ काढावयाच्या कामाकरीता येणा-या खर्चाच्या रु.२,३८,२०,३२०/- इतक्या रकमेपैकी ५०% केंद्र शासनाच्या हिश्श्याच्या रु.१,१९,१०,१६०/- इतक्या रकमेस केंद्र शासनाची दिनांक २६-०२-२००९ अन्वये मान्यता प्राप्त झालेली आहे. केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. ६ व ७ अन्वये वितरीत केलेली रु.१,१९,००,०००/- इतकी अर्थसहाय्याची रक्कम सन २००९-१० च्या अर्थसंकल्पामध्ये समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोकण विकास पॅकेज कार्यक्रमांतर्गत मिरकरवाडा बंदरातील गाळ काढण्यासाठी मार्च, २०१० च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात पूरक मागणी बाब क्र.२५ अन्वये रु.१,१९,००,०००/- इतका खर्च सन

२००९-१० च्या सुधारित अंदाजानुसार मिळालेल्या मंजुर अनुदानातून भागविता येणे शक्य असल्यामुळे लक्षणीक पूरक मागणी द्वारे आयुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई यांना खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त कामासाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षातर्गत उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा-

**मागणी क्रमांक डी-६**
**२४०५-मत्स्यव्यवसाय**
**१०३-सागरी मत्स्यव्यवसाय**
**(दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,**
**(०२)(१२) मासेमारी बंदरातील गाळ काढणे (२४०५ ४८९४)**
**(दत्तमत)**
**५० इतर खर्च**

३. आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

४. हे आदेश नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-७/व्यय-१, दि.२०-०१-२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावरुन प्रसारित करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३२९१८३५१४००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(सु.तु.शेंडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रति)
प्रादेशिक मत्स्यव्यवसाय उपसंचालक, मुंबई
सहाय्यक मत्स्यव्यवसाय संचालक, रत्नागिरी
जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
महालेखापाल-१ महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई-३२
निवडनस्ती.